शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात (१९) आहार खर्च या उद्दिष्टाखाली रु. २८०० हजार इतकी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध व वितरित करुन देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपुवि-०२२५/प्र.क्र.४८/प्रशा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, गो. ते. संकुल इमारत,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २७ फेब्रुवारी, २०२५

वाचा -

१) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्र. संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१७८/प्रशासन-२, दिनांक ०६.०२.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५

प्रस्तावना -

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथे दाखल आंतररुग्णांना दिल्या जाणा-या आहाराचे प्रलंबित देयके अदा करण्याकरीता अल्प अनुदान मंजूर असल्याने संस्थेच्या इतर उद्दिष्टांतर्गत शिल्लक असलेल्या निधीतून रु.२८ लक्ष इतका निधी (१९) आहार खर्च या उद्दिष्टांतर्गत पुनर्विनियोजनाद्वारे वळती करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली असून, उक्त निधी पुनर्विनियोजनाद्वारे वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर (लेखाशिर्ष २२१०१६४३) या संस्थेतील रुग्णांच्या आहाराकरीता रुपये २८ लक्ष इतका निधी संस्थेच्या (१३) कार्यालयीन खर्च व (५२) यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्टांतर्गत शिल्लक निधीतून (१९) आहार खर्च या उद्दिष्टांतर्गत पुनर्विनियोजन करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच सदर निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. विवरणपत्र अ मध्ये नमुद केल्या प्रमाणे पुनर्विनियोजनाद्वारे संबंधित वळती करण्यात आलेला निधी उक्त संस्थेच्या वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला असून विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामधील वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१६६/व्यय १३, दि.२४.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२७१४४५३५३४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT,
2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.02.27 14:46:36 +05'30'

**(म.गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, नागपूर/मुंबई.
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अलेप), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (प्रशा-२), वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

## शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-०६२४/प्र.क्र.४८/प्रशा-२, दि. २७ फेब्रुवारी २०२५ सोबतचे विवरणपत्र अ

**वित्तीय वर्ष २०२४-२५**

**विवरणपत्र अ**

(रक्कम हजारात)

| अ. क्र. | संस्थेचे नाव व लेखाशिर्ष (मागणी क्र. S १) | उद्दिष्ट | अर्थसंकल्पीत निधी | पुर्नविनियोजनाची रक्कम (-) | पुर्नविनियोजना नतंरची होणारी रक्कम | अ. क्र. | संस्थेचे नाव व लेखाशिर्ष (मागणी क्र. S १) | उद्दिष्ट | अर्थसंकल्पीत निधी | पुर्नविनियोजनाची रक्कम (+) | पुर्नविनियोजना नतंरची होणारी रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर (२२१०१६४३) (अनिवार्य) | (१३) कार्यालयीन खर्च | ६०२७ | (-)२२०० | ३८२७ | १. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर (२२१०१६४३) (अनिवार्य) | (१९) आहार खर्च | ११७७० | (+)२८०० | १४५७० |
| | | (५२) यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | २४०७ | (-) ६०० | १८०७ | | | | | | |